**अशोका एज्युकेशन फाऊंडेशन, नाशिक संचलित युनिव्हर्सल स्कूल, नंदनवन इस्टेट, गंगापूर रोड, चांदशी, जि.नाशिक या शाळेचे, अर्जुन नगर, गंगापूर रोड, चांदशी, ता.जि.नाशिक येथे स्थलांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशास्थ ३३१८/प्र.क्र.४२८/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २२ जून, २०१८

**वाचा :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांकः माशास्थ २०१२/(५९/१२)माशि-२, दिनांक ३१ जुलै, २०१३.

**संदर्भ :-** विभागीय शिक्षण उपसंचालक, औरंगाबाद यांचे क्र.शिउसं/नावि/प्राथ-१/खाप्राशा/स्थ/ २०१८/११४२७/३०, दिनांक २/०३/२०१८ चे पत्र

**प्रस्तावना :-**

अशोका एज्युकेशन फाऊंडेशन, नाशिक संचलित युनिव्हर्सल स्कूल, नंदनवन इस्टेट, गंगापूर रोड, चांदशी, जि.नाशिक या इंग्रजी माध्यमाच्या कायम विनाअनुदानित (प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक (इयत्ता १ ली ते १० वी आयसीएसई व इयत्ता ११ वी व १२ वी राज्यमंडळ) शाळेचे, अर्जुन नगर, गंगापूर रोड, चांदशी, ता.जि.नाशिक येथे स्थलांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शाळेच्या सध्याच्या ठिकाणी अपुऱ्या भौतिक सुविधा असल्यामुळे ३० वर्षाकरिता भाडयाने घेतलेल्या प्रशस्त इमारतीत स्थलांतर प्रस्तावित आहे. सदर शाळेचे वर नमूद ठिकाणी स्थलांतर करण्यास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे :-

१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

२) शाळेतील विद्यार्थ्यांच्या पालकांची स्थलांतरास संमती असल्याची लेखी स्वरूपात खात्री करणे तसेच शाळेतील सर्व विद्यार्थ्यांचे स्थलांतराच्या ठिकाणी समायोजन करणे आवश्यक राहील.

३) स्थलांतरास सर्व शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी यांची सहमती असावी. तसेच सर्व पात्रताधारक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना स्थलांतरित ठिकाणी सामावून घेण्यात येईल व त्यांच्या सेवाशर्तीमध्ये बदल होणार नाही याबाबत संस्थेच्या अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

४) शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशानुसार शाळेसाठी पक्की इमारत व सर्व भौतिक सुविधा आणि शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून देण्यात येतील. याबाबत संस्थेच्या अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

५) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

६) स्थलांतरीत शाळेच्या बाबतीत मूळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तींमध्ये बदल होणार नाही.

७) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर आहे, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

८) सदर शाळा ही कायम विनाअनुदानित तत्वावरील असल्याने त्यामध्ये कार्यरत शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे संपूर्ण दायित्व संस्थेवर राहील.

९) सदरहू स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. वरील अट क्र.(३) व (४) ची पूर्तता झाल्यावर, विभागीय शिक्षण उपसंचालक,नाशिक विभाग, नाशिक यांनी सदर शाळेच्या स्थलांतरास मान्यता देण्याबाबत आवश्यक पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२२१६५१४८४८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.06.22 16:54:15 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत –**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नवीन प्रशासकीय मध्यवर्ती इमारत, नाशिक रोड, नाशिक- ४२२ ००१.
३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, नाशिक
४) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, नाशिक
५) अध्यक्ष, अशोका एज्युकेशन फाऊंडेशन, नाशिक
६) निवडनस्ती ( एसएम-१).